नागपूर हज हाऊसच्या दुरुस्ती व सौंदर्यीकरणाच्या कामांना निधी वितरित करणेबाबत.
आर्थिक वर्ष सन २०२४-२५

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हज २०२४/प्र.क्र.८७/का-५**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२५

वाचा :-

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.हज२०२४/प्र.क्र.८७/का-५ दि.१४.०२.२०२५
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४, दि.१७ मार्च, २०२५

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यातून हज यात्रेसाठी नागपूर गंतव्यस्थानातून प्रस्थान करणा-या यात्रेकरुंकरिता नागपूर येथे हज हाउस बांधण्यात आले आहे. सदर हज हाऊस हे सन २०१२ पासून कार्यरत आहे. सदर गंतव्यस्थानातून दरवर्षी १००० ते १५०० यात्रेकरू हज यात्रेसाठी प्रस्थान करतात. सदर यात्रेकरुंच्या तात्पुरत्या वास्तव्याची सोय तसेच त्यांची हज प्रशिक्षणे इत्यादी बाबींकरिता नागपूर हज हाऊस इमारतीचा वापर करण्यात येतो . त्यासाठी नागपूर हज हाऊसच्या इमारतीची डागडुजी व दुरुस्ती तसेच इमारतीसमोरील जागेचे पार्किंग तसेच अन्य वापराच्या दृष्टीने सौदर्यीकरण या कामांच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कामाची निविदा प्रक्रिया करणेकरीता एकूण मूल्याच्या १० टक्के म्हणजेच रु.१.२० कोटी इतका निधी कार्यकारी अभियंता,सनागपूर यांना उपलब्ध करुन देण्या उक्त शासन निर्णयान्वये मान्यतादेण्यात आली आहे. सदर कामाची निविदा प्रक्रिया करणेकरीता वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील शासन परिपत्रकास अनुसरुन सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता असलेल्या वित्तीय बंधनाच्या मर्यादेस अनुसरुन हाऊसच्या दुरुस्ती व सौंदर्यीकरणाच्या कामांची निविदा प्रक्रिया करणेकरीता **रु.१.२० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी वीस लाख फक्त)** इतकी तरतूद खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता | २०२४-२५ करीता वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| (१) | (२) | (४) |
| नागपूर हज हाऊसच्या दुरुस्ती व सौंदर्यीकरण (२२३५ ए २७६ ) | १२.०२५१ | **१.२०** |
| **(अक्षरी रुपये एक कोटी वीस लाख फक्त)** | **एकूण** | **१.२०** |

२.	सदर रक्कम अवर सचिव, कार्यासन-२ तथा आहरण व संवितरण अधिकारी यांच्या खाती वितरीत करण्यात यावी. तद्‌नंतर इ.सी.एस.द्वारे /ई-कुबेरद्वारे " सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर " यांना अदा करण्यात यावी.

३.	शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / कार्यालयीन आदेश/सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्य नियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

४.	सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी विहित मुदतीत शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

५.	यावर होणारा खर्च “मागणी क्र. झेड ई-१ , २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २००, इतर कार्यक्रम, (०१) (१९) हज समितीला सहायक अनुदान (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३५ ए २७६)” या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६.	सदरचा शासन निर्णय प्रशासकीय विभागांना संदर्भ क्र.२ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.२२६/१४७१, दि.२५ मार्च, २०२५ आणि वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र. १४९/२०२५/व्यय-१, दि.२९ मार्च, २०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२५०३३११६०५३५८०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VISHAKHA SACHIN ADHAV

Digitally signed by VISHAKHA SACHIN ADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=b2ad90146c0c24582e5f69373fdb00dd8bff89e962d3f5d3bb153e589b39cc43, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=65EF4533476D0EA1DB9995A9B28EDC4173C3B94922081D293614536B5BEAD664, cn=VISHAKHA SACHIN ADHAV
Date: 2025.03.31 16:06:10 +05'30'

**(विशाखा आढाव )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा व १अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
४. मा.मंत्री (अ.वि.) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
५.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
६. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई
५. अवर सचिव (का.२), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (व्यय-१/अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८.अवर सचिव (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवडनस्ती (का-५)